सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठास ३६- सहायक अनुदान (वेतन) करीता अनुदान वितरीत करण्याबाबत (अनिवार्य)....

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२१/प्र.क्र.६५/७-अे,**
दिनांक : ०४ मार्च, २०२२.

वाचा :- १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.०३.०२.२०२२.

२) कृषि विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दि.०८.०४.२०२१, दि. २९.०४.२०२१, दि.०१.०६.२०२१, दि. ०१.०७.२०२१, दि.३०.७.२०२१, दि.३०.०८.२०२१, दि. २८.०९.२०२१, दि.०५.१०.२०२१, दि.२७.१०.२०२१, दि.२९.१२.२०२१, दि.१४.०१.२०२२ व दि.१४.०२.२०२२.

३) नियंत्रक,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे पत्र क्रमांक. अप्रवि/अंदाज/ अनु वि./१९२६/२०२२ दि.१८.०२.२०२२.

**प्रस्तावना:-**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत लेखाशिर्ष (२४१५ ००४३) करीता ३६- सहायक अनुदान (वेतन) करीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील आतापर्यंत एकूण अर्थसंकल्पीत रु. १५१७६.५९ लक्ष इतक्या निधीच्या ९५% निधी उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दि.१४.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. अकोला कृषि विद्यापिठाच्या मागणीनुसार अर्थसंकल्पीत तरतुदीतील उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सदर शासन निर्णयान्वये, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत मासिक वेतन देयके अदा करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील लेखाशीर्ष, मागणी क्र.डी-३, २४१५ कृषिविषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीक संवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००) (०३) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (अनिवार्य) (२४१५ ००४३), “३६- सहाय्यक अनुदाने (वेतन)” करीता रु.७,५८,८४,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी अठ्ठावन्न लाख चौ-यांशी हजार फक्त) इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यास व खर्चास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वरीलप्रमाणे विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

२) सन २०२१-२२ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

३) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

३. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत नियमानुसार आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदरचे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२, १४३, १४४ व १६२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं/२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६/०४/२०२० च्या परिपत्रकातील सर्व अटी व शर्तीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ६५/२०२२/व्यय-१, दि.२४/०२/२०२१ नुसार प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३०४१६४९१९०५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15c7ee448037873e9a798068206bca7a76131bdca6b4660721edcffa24f13d02, pseudonym=DF028EC074B9701EF79AA9C9DDE9252E3743EE7A, serialNumber=32E5D5F3AC71BC2B5E34B484CA757B21FC3E12CE30CAE2D0F913FE77E2B06737, cn=VARSHA M MEHER
Date: 2022.03.04 16:51:05 +05'30'

**( वर्षा मेहेर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
२. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
३. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
४. उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला / उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
८. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९. अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
१०.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१३.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.